**कै.बी.जी.छाया, उपजिल्हा रुग्णालय, अंबरनाथ, जि.ठाणे येथे सामावून घेतलेल्या महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ (वेतनस्तर S-२० : ५६१००-१७७५००) या संवर्गातील डॉ.आशा रामेश्वर रायबोले, वैद्यकीय अधिकारी यांना पदस्थापना देण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
**शासन आदेश क्रमांकः मवैअ-२०२०/प्र.क्र.२०० /सेवा-३**

१० वा मजला, संकुल इमारत, गो.ते. रुग्णालय, संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक: २२ नोव्हेबर, २०२१

**वाचा:-** शासन आदेश क्र.अनंप २०१७/प्र.क्र.३६१/आ.३ अ दि.१८.०९.२०१९

**शासन आदेश:-**

वाचा येथील दिनांक १८.०९.२०२१ च्या शासन निर्णयान्वये कै.बी.जी.छाया, उपजिल्हा रुग्णालय, अंबरनाथ, जि.ठाणे येथील वैद्यकीय अधिका-यांचे सार्वजनिक आरोग्य विभागातील रुग्णालयामधील समकक्ष रिक्त पदावर दिनांक.०१.०८.२०१८ पासून पूर्वलक्षी प्रभावाने सामावून घेण्यास मान्यता दिली आहे. डॉ.आशा रामेश्वर रायबोले,महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वेतनस्तर S-२० : ५६१००-१७७५००) या संवर्गातील, आहेत. त्यांनाही उपरोक्त शासन निर्णयान्वये सामावून घेण्यात आले आहे. सद्यस्थितीत डॉ.रायबोले ह्या त्यांच्या समावेशनानंतर कै.बी.जी.छाया उपजिल्हा रुग्णालय, अंबरनाथ जि.ठाणे येथे कार्यरत असल्या तरी त्यांचे पदस्थापनेचे आदेश निर्गमित करणे शासनाच्या विचाराधिन होते. त्यास अनुसरुन डॉ.आशा रायबोले यांना खालील तक्त्यात त्यांच्या नावासमोर रकाना क्र. ३ येथे नमूद ठिकाणी पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | वैद्यकीय अधिकाऱ्याचे नाव | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|
| १ | २. | ३. |
| १ | डॉ. आशा रामेश्वर रायबोले, | कै.बी.जी.छाया, उपजिल्हा रुग्णालय, अंबरनाथ जि.ठाणे |

१. उक्तप्रमाणे डॉ.रायबोले यांना पदस्थापना देण्यात येत असून त्यांच्याबाबतीत वाचा येथील शासननिर्णयातील सर्व अटी व शर्ती लागु राहतील. या आदेशान्वये पदस्थापना देण्यात आलेल्या डॉ.रायबोले यांनी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. विहित मुदतीत रुजू न झाल्यास संबंधित वैद्यकीय अधिकारी हे अनधिकृत गैरहजरी समजून त्यांच्यावर शिस्तभंगाची कारवाई प्रस्तावित करण्यात येईल.

२. सदर वैद्यकीय अधिका-यांनी, जात वैधता प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.तसेच, वैद्यकीय अधिकारी, गट-अ या सवंवर्गाच्या सेवाप्रवेश नियमानुसार मराठी व हिंदी भाषा परिक्षा आणि संगणक अर्हता परीक्षा उत्तीर्ण होणे / असणे आवश्यक राहील.

३. तसेच त्यांना महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ वेतनस्तर(वेतनस्तर S-२० : ५६१००-१७७५००) या सवर्गाचे कार्य कर्तव्ये व जबाबदा-या लागु राहील.

४. संबंधित संस्थेच्या आहरण व संवितरण अधिका-यांनी पदस्थापना दिलेल्या सदर वैद्यकीय अधिका-यांचे वेतन वाचा येथील शासननिर्णयातील तरतुदीनुसार अदा करावेत.

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२२१४५३२६१५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE
VIJAYKUMAR
LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2021.11.22 15:27:46 +05'30'

**( वि. ल. लहाने )**
**सह सचिव , महाराष्ट्र शासन**

प्रति,

संबंधित वैद्यकीय अधिकारी गट-अ (यांना संबंधित उपसंचालक, आरोग्य सेवा मुंबई मंडळ, ठाणे यांच्या मार्फत)

**प्रत,**

१) आयुक्त आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
३) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
४) उपसंचालक आरोग्य सेवा, ठाणे.
५) जिल्हा शल्य चिकित्सक, ठाणे.
६) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद,ठाणे.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
८) निवडनस्ती (सेवा-३)